राज्य शासकीय कर्मचा-यांना व इतरांना
वाहतूक भत्ता मंजूर करण्याबाबत........
स्पष्टीकरण

## महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : वाहभ- १०९९/प्र.क्र.४५/सेवा-५,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक ९ मे, २००३.**

पहा : (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-१०९४/प्र.क्र.४१/सेवा-५, दिनांक २१ ऑक्टोबर, १९९४
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-१०९४/प्र.क्र.४१/सेवा-५, दिनांक २८ ऑक्टोबर, १९
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वाहभ-१०९८/प्र.क्र.८३/९८/सेवा-५, दिनांक १४ डिसेंबर, १९९
(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वाहभ-१०९९/प्र.क्र.८२/९९/सेवा-५, दिनांक ७ सप्टेंबर, १९९९.

## परिपत्रक

वरील (३) व (४) येथील आदेशान्वये राज्य शासकीय कर्मचा-यांना व इतरांना दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून निवासस्थानापासून कर्तव्यस्थानापर्यंतच्या प्रवासावरील खर्चाची भरपाई म्हणून वाहतूक भत्ता (Transport Allowance) मंजूर करण्यात आला आहे. सदर वाहतूक भत्त्याच्या अनुज्ञेयतेबाबत काही मुद्दे उपस्थित करण्यात आले आहेत. त्या संदर्भात शासन आता खालीलप्रमाणे खुलासा करीत आहे :—

| मुद्दे | स्पष्टीकरण |
|---|---|
| (१) कर्तव्यस्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत खाजगी निवासस्थानात राहणा-या कर्मचा-यांनाही वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | अनुज्ञेय आहे. |
| (२) कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात (Campus) शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या कर्मचा-यास वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परीसरात (Campus) शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या कर्मचाऱ्यास कर्मचाऱ्याचे निवासस्थान आणि कर्तव्यस्थान यातील अंतर १ किलोमीटर व त्यापेक्षा जास्त असले तरीही वाहतूक भत्ता अनुज्ञेय नाही. |
| (३) वाहतूक भत्याची परिगणना करण्यासाठी, अनुपस्थितीचा कालावधी मोजताना अशा कालावधीच्या पुढे व मागे जोडून येणा-या सुट्ट्या त्या कालावधीत समाविष्ट कराव्यात किंवा कसे ? | अनुपस्थितीचा कालावधी मोजताना अशा कालावधीला जोडून येणारे पुढील व मागील सुटीचे शनिवार, रविवार आणि सार्वजनिक व विशेष सुट्या वगळण्यात याव्यात. |
| (४) अनुपस्थितीचा कालावधी वेगवेगळ्या कॅलेंडर महिन्यातील असल्यास वाहतूक भत्त्याचे विनियमन कसे करावे ? | अनुपस्थितीचा कालावधी मोजतांना कॅलेंडर महिने स्वतंत्रपणे विचारात न घेता, तो सलगपणे विचारात घ्यावा.<br>उदा. एखादा कर्मचारी एखाद्या वर्षी १५ जुलै ते २० ऑगस्ट या कालावधीसाठी अनुपस्थित असेल तर या आदेशांच्या प्रयोजनार्थ त्याच्या अनुपस्थितीचा कालावधी (पुढे मागे जोडून येणारे सुटीचे दिवस वगळून) ३७ दिवस इतका असेल. ह्या ३७ दिवसांच्या अनुपस्थितीच्या कालावधीसाठी त्याला वाहतूक भत्ता मिळणार नाही. मात्र जुलै आणि ऑगस्ट या महिन्यातील उर्वरित कालावधीसाठी त्याला यथाप्रमाण (in proportion) वाहतूक भत्ता अनुज्ञेय असेल. |
| (५) (i) दीर्घ सुटी अनुज्ञेय असलेल्या कर्मचाऱ्यांना दीर्घ सुटीच्या कालावधीत वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | दीर्घ सुटीचा कालावधी कमाल ३० दिवस इतका असेल तर, अन्य अटींच्या अधीन राहून, वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरेल.<br>मात्र, दीर्घ सुटीचा कालावधी ३० दिवसांपेक्षा जास्त असेल तर वाहतूक भत्ता अनुज्ञेय असणार नाही. |

| | |
|---|---|
| (ii) दीर्घ सुटी अनुज्ञेय असलेल्या कर्मचाऱ्यांना दीर्घ सुटीच्या कालावधीत मुख्यालयाच्या हद्दीत वा त्याबाहेर प्रशिक्षणासाठी पाठविण्यात आल्यास त्यांना वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | दीर्घ सुटीच्या कालावधीत प्रशिक्षणासाठी वा इतर शैक्षणिक किंवा प्रशासकीय कर्तव्य पार पाडण्यासाठी मुख्यालयाच्या हद्दीत वा त्याबाहेर कर्मचाऱ्यास पाठविण्यात आल्यास त्याची दीर्घसुटी खंडीत झाल्याचे समजण्यात यावे आणि त्यांना जर दैनिक भत्ता, मोफत वाहन सुविधा वा कोणत्याही प्रकारच्या वाहनभत्त्याचा लाभ या प्रयोजनार्थ मिळत नसेल तर, वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरेल. मात्र प्रशिक्षण वा शैक्षणिक कार्य पार पाडण्यासाठी व्यतित केलेला संपूर्ण कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून नियमित केला नसेल तर या कालावधीत वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरणार नाही. |
| (६) (i) निलंबन कालावधीत वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | निलंबन कालावधीत वाहतूक भत्ता अनुज्ञेय नाही. |
| (ii) निलंबन कालावधी हा नंतरच्या आदेशान्वये कर्तव्य कालावधी म्हणून विनियमित करण्यात आला असेल तर त्या कालावधीसाठी वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरतो किंवा कसे ? | निलंबन कालावधी कालांतराने कर्तव्य कालावधी म्हणून नियमित झाला तरी त्या कालावधीसाठी वाहतूक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही. |
| (७) कर्तव्य म्हणून मानल्या गेलेल्या प्रशिक्षण कालावधीत कर्मचा-यांना वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | अशा प्रकरणी जर संबंधित कर्मचा-याच्या शासकीय निवासस्थानापासून प्रशिक्षणाचे ठिकाण (असे ठिकाण मुख्यालय हद्दीतील वा त्याबाहेरील असू शकेल) १ किलोमीटरपेक्षा जास्त अंतरावर असेल *(किंवा तो वास्तव्य करीत असलेल्या खाजगी निवासस्थानापासून प्रशिक्षणाचे ठिकाण १ किलोमीटरपेक्षा कमी वा जास्त अंतरावर असेल)* आणि त्यास या प्रशिक्षणाला उपस्थित राहण्यासाठी कोणतीही वाहन सुविधा / प्रवासभत्ता /दैनिक भत्ता देण्यात आला नसेल तर प्रशिक्षणाचा कालावधी कितीही दिवसांचा असला तरी, वाहतूक भत्ता अनुज्ञेय ठरेल.<br><br>मात्र प्रशिक्षणासाठी **दौ-यावर** असणा-या कर्मचा-यास, जर त्याची अनुपस्थिती ३० दिवसांपेक्षा जास्त असेल तर त्याला वाहतूक भत्ता अनुज्ञेय होणार नाही. |
| (८) (i) निरीक्षणाच्या कामासाठी जाणा-या निरीक्षण पथकाच्या सदस्यांना वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ?<br><br>(ii) क्षेत्रीय कामासाठी सतत (Continuously) फिरती करावी लागणा-या कर्मचा-यांना वाहतूक भत्ता अनुज्ञेय आहे किंवा कसे ? | वाहतूक भत्ता हा कर्मचा-याला त्याच्या निवासस्थानापासून ते कर्तव्यस्थानापर्यंतच्या व परतीच्या प्रवासावरील खर्च भागविण्यासाठी दिला जातो. जर कर्मचा-यास निवासस्थान ते निरीक्षणाचे स्थान / क्षेत्रीय कामाचे स्थान व परत अशा ३० दिवसांपेक्षा जास्त कालावधीतील निरीक्षण / फिरतीनिमित्तच्या प्रवासासाठी प्रवासभत्ता / दैनिक भत्ता वा मोफत वाहन सुविधेचा लाभ मिळत असेल वा कोणत्याही प्रकारचा वाहन भत्ता मिळत असेल तर कर्मचा-यास वाहतूक भत्ता मिळणार नाही. |
| (९) एखाद्या ठिकाणची विशेष परिस्थिती लक्षात घेऊन, निवासस्थानाचे ठिकाण ते कार्यालय व परत या प्रवासावरील खर्चाची भरपाई म्हणून विशेष रोख भत्ता / विशेष रक्कम इत्यादी मंजूर करण्यात आली असेल तर त्या ठिकाणी काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना वाहतूक भत्ता देय होईल किंवा कसे ? | वाहतूक भत्ता कर्मचाऱ्याला त्याच्या निवासस्थानापासून ते कर्तव्यस्थानापर्यंतच्या प्रवासावरील खर्चाची भरपाई म्हणून दिला जातो. त्याच प्रयोजनासाठी अन्य नांवाने प्रवास खर्चाची भरपाई मंजूर करण्यात आली असेल तर एकाच वेळेस वाहतूक भत्ता आणि अन्य नांवाने भरपाई मंजूर करता येणार नाही. अशा प्रकरणी कोणताही एक पर्याय निवडण्याचा विकल्प देण्यात यावा. |

२. वाहतूक भत्त्याच्या अनुज्ञेयतेसंदर्भातील तरतूदींचा, वर नमूद केलेल्या स्पष्टीकरणापेक्षा वेगळा अर्थ लावला गेल्याने या भत्त्याचे अतिप्रदान झाले असेल तर अशी अतिप्रदानाची रक्कम **कमाल १२ समान हप्त्यांमध्ये** वसूल करण्यात यावी.

३. सिंधुदुर्ग जिल्ह्याचे मुख्यालय ' कुडाळ ' या ठिकाणाहून 'ओरोस ' या ठिकाणी हलविण्याबाबतचा निर्णय घेतल्यावर 'ओरोस ' या नव्या मुख्यालयी स्थानांतरीत केल्या जाणा-या कार्यालयात काम करणा-या कर्मचा-यांना त्यांचे मुख्यालयाचे जुने ठिकाण ते ओरोस येथील प्रशासकीय इमारत या दरम्यान कराव्या लागणा-या प्रवासासाठी, संदर्भाधीन (१) आणि (२) येथील आदेशान्वये, दरमहा रु.२४०/- या दराने विहीत अटींच्या अधीन राहून विशेष रोखभत्ता मंजूर करण्यात आला आहे. आता संदर्भाधीन (३) आणि (४) येथील आदेशान्वये, सर्व राज्य शासकीय कर्मचारी व इतरांना विहीत अटींच्या अधीन राहून दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून वाहतूक भत्ता मंजूर करण्यात आला असल्याने, विशेष रोख भत्याच्या अनुज्ञेयतेबाबत पढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :—

**(अ)** ओरोस येथे कार्यरत असणा-या आणि विशेष रोख भत्ता व वाहतूक भत्ता अशा दोनही भत्यांचा लाभ घेणा-या कर्मचा-यांना या दोनपैकी एकच भत्ता अनुज्ञेय ठरविण्यात यावा. विशेष रोख भत्ता व वाहतूक भत्ता या दोनपैकी कोणताही एक भत्ता स्विकारण्याचा विकल्प कर्मचा-यांकडून घेण्यात यावा.

**(ब)** सध्या सेवेत असणारे जे कर्मचारी वाहतूक भत्ता स्विकारण्याचा विकल्प देतील, त्या कर्मचा-यांना दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून देण्यात आलेल्या विशेष रोख भत्याची **कमाल ३६ समान मासिक हप्त्यात** वसुली करण्यात यावी.

**(क)** जे कर्मचारी विशेष रोख भत्ता स्विकारण्याचा विकल्प देतील, त्या कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीमध्ये ऑगस्ट १९९७ ते सप्टेंबर १९९८ च्या कालावधीसाठी वाहतूक भत्याची थकबाकी जमा करण्याबाबतचे आदेश रद्दबातल समजण्यात यावेत. हे आदेश रद्द करण्यात आल्याने अशा जमा करण्यात आलेल्या रकमेवर मिळणारे व्याजही संबंधितांना मिळणार नाही.

**अशा कर्मचा-यांना ऑक्टोबर १९९८ पासून अदा करण्यात आलेल्या वाहतूक भत्याची कमाल ३६ मासिक हप्त्यांमध्ये वसुली करण्यात यावी.**

४. वरील परिच्छेद २ व ३ मध्ये देण्यात आलेल्या आदेशांच्या परिणामी उद्‌भवणाऱ्या वाहतूक भत्याच्या रकमेची वसुली माहे मे, २००३ या महिन्याच्या वेतनापासून सुरु करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**शु. श. कारेकर,**
शासनाचे उप सचिव

प्रत,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
राज्यपालांचे सचिव
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व विभागीय आयुक्त
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* महासंचालक, ऑल इंडिया इन्स्टीट्यूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
नगरविकास विभाग, यूडी-१०, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)

